**प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा लाभ जास्तीत जास्त तरुणांना मिळावा यासाठी या योजनेचा प्रचार, प्रसार व समन्वयासाठी जिल्हास्तरावर गठित मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीस निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी १६१८/प्र.क्र.५०/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ डिसेंबर, २०१८.

वाचा:

१. **नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी १६१६/प्र.क्र.४९/का.१४१७ दि.१४ जून, २०१६.**
२. **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.**
३. **नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.२०/का-१४१७, दि.११ ऑक्टोबर, २०१८**

**प्रस्तावना:**

नियोजन विभागाचे संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना ग्रामीण, दुर्गम आणि अती दुर्गम भागात प्रभावीपणे माहिती होण्यासाठी आणि या योजनेचा लाभ गरजू आणि होतकरु व्यक्ती आणि बेरोजगार यांना व्हावा या हेतूने ग्रामीण आणि दुर्गम भागातील जनमानसात प्रभावीपणे प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना समन्वय समितीची दि. १४ जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समन्वय समिती गठीत करण्यात आली आहे. प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेची प्रचार व प्रसिध्दी करण्याकरीता जिल्हयांच्या मागणीनुसार प्रत्येक वर्षी जिल्हास्तरीय समितीस निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदर योजनेसाठी चालू आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये ३४५१ अे ००१-२६ (जाहिरात व प्रसिध्दी) या लेखाशीर्षाअंतर्गत रुपये २० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा प्रचार व प्रसार आणि समन्वय करण्याकरीता जिल्हयांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

अहमदनगर, अकोला, भंडारा, बुलडाणा, गोंदिया, जालना, कोल्हापूर, मुंबई शहर, नांदेड, नंदुरबार, नाशिक, पालघर, परभणी, रायगड, रत्नागिरी, सातारा, ठाणे आणि यवतमाळ येथील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना समन्वय समितीस संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता खालीलप्रमाणे एकूण रू.३,४३,००,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी त्रेचाळीस लाख फक्त) निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समिती | सन २०१८-१९ मध्ये द्यावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|
| १ | अहमदनगर | २१,००,०००/- |
| २ | अकोला | १५,४०,०००/- |
| ३ | भंडारा | १५,४०,०००/- |
| ४ | बुलडाणा | २१,००,०००/- |
| ५ | गोंदिया | १५,४०,०००/- |
| ६ | जालना | १५,४०,०००/- |
| ७ | कोल्हापूर | २१,००,०००/- |
| ८ | मुंबई शहर | २१,००,०००/- |
| ९ | नांदेड | २१,००,०००/- |
| १० | नंदुरबार | १५,४०,०००/- |
| ११ | नाशिक | २३,१०,०००/- |
| १२ | पालघर | २१,००,०००/- |
| १३ | परभणी | १५,४०,०००/- |
| १४ | रायगड | २१,००,०००/- |
| १५ | रत्नागिरी | १५,४०,०००/- |
| १६ | सातारा | २१,००,०००/- |
| १७ | ठाणे | २३,१०,०००/- |
| १८ | यवतमाळ | २१,००,०००/- |
| **एकूण** | | **३,४३,००,०००/-** |

(अक्षरी रूपये तीन कोटी त्रेचाळीस लाख फक्त)

२. प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेचा प्रचार व प्रसार आणि समन्वय करण्याकरीता जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समन्वय समितीची कार्यकक्षा नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१६/प्र.क्र.४९/का-१४१७, दिनांक १४ जून, २०१६ मध्ये नमूद करण्यात आली आहे. प्रधानमंत्री मुद्रा बँक योजना प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमामध्ये सर्व जिल्हयांमध्ये एकसमानता आणण्याच्या दृष्टीने प्रचार व प्रसिध्दीच्या १२ बाबी या राज्यस्तरावरुन माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यमातून संदर्भाधीन नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.२०/का-१४१७, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८ मध्ये नमूद केलेनुसार राबविण्यात येणार आहे.

३. जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समन्वय समितीने मान्यता दिलेल्या जिल्हास्तरीय आराखड्यानुसार बाब / शीर्ष प्रमाणे निधी खर्च करताना नियोजन विभागाचे संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाने संदर्भिय शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. उपरोक्त निधी हा संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा. सदर निधी कोषागार कार्यालयातून आहरित व संवितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी हे "नियंत्रक अधिकारी" राहतील, तसेच संबंधित "जिल्हा नियोजन अधिकारी" हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. राज्य निवडणूक आयोगाचे वेळोवेळी निवडणूकी संदर्भातील आचारसंहितेचे निर्गमित होणारे आदेश विचारात घेऊन योग्य ती कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

६. राज्यस्तरावरुन निश्चित केलेल्या प्रचार व प्रसिध्दीच्या १२ शीर्ष / बाब निहाय कामे हे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून राबविण्यात येत असल्याने जिल्हास्तरावरुन राबविण्यात येणाऱ्या प्रचार व प्रसिध्दी आराखड्यामध्ये या १२ बाबींची व्दिरुक्ती करण्यात येवू नये.

७. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०१) (११) मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (३४५१ अे ००१) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०४१५४०३३३९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.12.04 15:44:47 +05'30'

**(प्रियांका रं. छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, अहमदनगर, अकोला, भंडारा, बुलडाणा, गोंदिया, जालना, कोल्हापूर, मुंबई शहर, नांदेड, नंदुरबार, नाशिक, पालघर, परभणी, रायगड, रत्नागिरी, सातारा, ठाणे, यवतमाळ.
७. जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर, अकोला, भंडारा, बुलडाणा, गोंदिया, जालना, कोल्हापूर, मुंबई शहर, नांदेड, नंदुरबार, नाशिक, पालघर, परभणी, रायगड, रत्नागिरी, सातारा, ठाणे, यवतमाळ.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, अकोला, भंडारा, बुलडाणा, गोंदिया, जालना, कोल्हापूर, मुंबई शहर, नांदेड, नंदुरबार, नाशिक, पालघर, परभणी, रायगड, रत्नागिरी, सातारा, ठाणे, यवतमाळ
९. वित्त विभाग/व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. कार्यासन अधिकारी (का. १४११/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
११. निवडनस्ती, कार्यासन १४१७.